हरणबारी मध्यम प्रकल्प, ता. बागलाण (सटाणा), जि. नाशिक या प्रकल्पांतर्गत वाघळे व नामपूर बंधारा कालव्यास विमोचक बांधणे व अंबासन बंधाऱ्याच्या विशेष दुरूस्ती कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र. २६२ /२०१६)/ सिं.व्य. (कामे)

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ०२ /०८ / २०१७.

वाचा :- १. मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे पत्र क्र. उमप्र/तां-५/४५९९/२०१६, दि.३०/०८/२०१६.

२. शासन निर्णय संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/ लपा-२, दि.२६.०५.२०१७.

प्रस्तावना :-

नाशिक जिल्हयाच्या बागलाण (सटाणा) तालुक्यातील हरणबारी मध्यम प्रकल्प हा तापी खोरे अंतर्गत गिरणा उपखोऱ्यात आहे. हा प्रकल्प मोसम नदीवर अंबापूर, ता. सटाणा, जि. नाशिक गावाच्या खालील बाजूस मोसम नदीवर १९९० मध्ये बांधण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पाच्या माती धरणाची लांबी १२३६ मी. असून महत्तम उंची ३४ मी. आहे. तसेच दगडी बांधकामातील १६१ मी. लांबीचा सांडवा आहे. प्रकल्पाची एकूण साठवण क्षमता ३४.७८ दलघमी आहे. प्रकल्पाचे एकूण लाभक्षेत्र ९७२६ हेक्टर असून मागील ५ वर्षात प्रवाही व उपसा सिंचनाने ३५४१ हेक्टर क्षेत्र भिजवले जाते. हरणबारी मध्यम प्रकल्पाअंतर्गत नामपूर व वाघळे बंधाऱ्याच्या कालवा मुखाशी विमोचक बांधून कालवा प्रवाह नियंत्रीत करणे व अतिरिक्त पाणी नदीपात्रात सोडण्यासाठी मुख्य विमोचक व आडवे विमोचक बांधणे तसेच मोसम नदीवरील अंबासन बंधारा दुरूस्त करून परिसरातील सिंचन क्षेत्र वाढवणे व भूजल पातळी वाढून अप्रत्यक्ष सिंचन क्षेत्र वाढेल त्यामुळे सदर कामे करणे आवश्यक आहे. सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापरसंस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. याअनुषंगाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर दुरुस्तीच्या कामाकरीता विशेष दुरुस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

हरणबारी मध्यम प्रकल्प, ता. बागलाण (सटाणा), जि. नाशिक या प्रकल्पांतर्गत वाघळे व नामपूर बंधारा कालव्यास विमोचक बांधणे व अंबासन बंधाऱ्याच्या विशेष दुरूस्ती अंतर्गत संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये कामांच्या रू. ७३,७९,९८३/- व अनुषंगिक खर्च रू. २,२१,३९९/- अशा एकूण रू. ७६,०१,३८२/- (रू.शहात्तर लक्ष, एक हजार, तीनशे ब्याऐंशी फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारान्वये व आंतरवित्त सल्लागार तथा उप सचिव यांच्यासहमतीने खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

२. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने , दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

३. कालवा स्वच्छता व माती भरावाची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करून घ्यावे.

४. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

५. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.

६. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (१२) उर्वरित महाराष्ट्र, (१२) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १९४) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २६ /२०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८०२१७२५५३६१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.08.02 17:27:57 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
शासनाच्या अवर सचिव

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक.
१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक.
१६) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र. २६२ /२०१६)/ सिं.व्य.(कामे) दि.०२ /०८ /२०१७ चे सहपत्र**

| **अ.क्र.** | **कामाचा तपशिल** | **प्र.मा.रक्कम (रूपयात)** |
| --- | --- | --- |
| १ | **हरणबारी मध्यम प्रकल्प, ता. बागलाण (सटाणा), जि. नाशिक अंतर्गत** | |
| | १. वाघळे बंधारा कालवा मुख्य विमोचक वजा आडवे विमोचक बांधणे व संरक्षक भिंत बांधणे | रू. १२,९५,५७१/- |
| | २. नामपूर बंधारा कालवा मुख्य विमोचक वजा आडवे विमोचक बांधणे | रू. ३,११,६१५/- |
| | ३. अंबासन बंधारा दुरूस्त करणे | रू. ५७,७२,७९७/- |
| | **एकूण बांधकाम खर्च** | **रू. ७३,७९,२८३/-** |
| २ | अनुषंगिक खर्च | रू. २,२१,३९९/- |
| | **एकूण** | **रू. ७६,०१,२८२/-** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.08.02 17:28:09 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
शासनाच्या अवर सचिव